सार्वजनिक आरोग्य विभागाच्या रुग्णालयातील दंतचिकित्सा विभागाचे बळकटीकरण अंतर्गत राज्यस्तरीय प्रशासनिक विभागातील ५ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः पदआ २०२०/प्र.क्र. ७६/आरोग्य ३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १९ मार्च, २०२०.

वाचा :

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पदआ २०१९/प्र.क्र.९२/आरोग्य-३, दि. १०.१०.२०१९.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/रामौआ/५ अपदे/दंतचिकित्सा विभाग/५२६६-६७/२०१९, दिनांक: २८.११.२०१९

**शासन निर्णय :**

उपरोक्त क्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या रुग्णालयातील दंतचिकित्सा विभागाचे बळकटीकरण अंतर्गत राज्यस्तरीय प्रशासनिक विभागातील संचालक स्तरावर सुरु करण्यात आलेल्या स्वतंत्र मौखिक आरोग्य कक्षातील ५ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० या कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार राज्यस्तरीय प्रशासनासाठी संचालक स्तरावर सुरु करण्यात आलेल्या स्वतंत्र मौखिक आरोग्य कक्षातील ५ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील नमूद लेखाशिर्षाकरीता मंजूर असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा व सन २०२०-२०२१ या वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - आर - १,**

“ २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
११० - ७ - पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना- राज्य योजना अंतर्गत योजना
(०६) (०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०२२६)

४. हा निर्णय, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दिनांक १२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८११४८२२८८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.03.19 17:19:20 +05'30'

**( रो.दि.कदम-पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल १/ २ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (आस्थापना), मुंबई.
६. उप संचालक, मौखिक आरोग्य कार्यक्रम.
७. वित्त विभाग (कार्यासन- व्यय-१३/ अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
८. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प).
९. निवडनस्ती (आरोग्य ३).

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक- पदआ २०२०/प्र.क्र.७६/आरोग्य-३,
दिनांक- १९ मार्च, २०२० चे सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी व ग्रेड पे (रुपये) | अस्थायी पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | उपसंचालक (मौखिक आरोग्य कार्यक्रम) | १५६००-३९१०० (ग्रेड पे ७६००) | १ |
| २ | सहायक संचालक | १५६००-३९१००(ग्रेड पे ६६००) | १ |
| ३ | सांख्यिकी सहायक | ९३००-३४८०० (ग्रेड पे ४२००) | १ |
| ४ | कनिष्ठ लिपीक | ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | १ |
| ५ | सहायक, गट-ड | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | १ |
| | **एकूण** | | **५** |